राज्यातील कुष्ठरुग्णांच्या पुनर्वसन, नोकरीत संधी निर्माण करणे व शासकीय योजनांचा लाभ मिळण्यासाठी राज्यस्तरीय समितीची स्थापना करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः** कुनिका-१२२३/प्र.क्र.१६२/२३/आरोग्य-५

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,

नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.

तारीख: : २६ जुलै, २०२३.

**प्रस्तावना -**

राष्ट्रीय कुष्ठरोग निर्मुलन कार्यक्रमांतर्गत राज्यातील विकृती दर्जा २ असलेल्या कुष्ठरुग्णांचे पुनर्वसन करणे, नोकरीत संधी निर्माण करुन देणे, शासकीय योजनांचा लाभ मिळणे सुलभ व्हावे यासाठी राज्यस्तरावर समिती स्थापन करणेबाबत मा. मंत्री (सार्वजनिक आरोग्य व कु.क.) यांनी अर्थसंकल्पीय अधिवेशन, २०२३ मध्ये आश्वासन दिले होते. त्यानुषंगाने राज्यातील कुष्ठरुग्णांचे पुनर्वसन, नोकरीत संधी निर्माण करुन देणे तसेच शासकीय योजनांचा लाभ मिळणे सुलभ व्हावे यासाठी राज्यस्तरीय समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

राष्ट्रीय कुष्ठरोग निर्मुलन कार्यक्रमांतर्गत राज्यातील विकृती दर्जा २ असलेल्या कुष्ठरुग्णांचे पुनर्वसन करणे, नोकरीत संधी निर्माण करुन देणे, शासकीय योजनांचा लाभ मिळणे सुलभ व्हावे यासाठी राज्यात राज्यस्तरीय समिती स्थापन करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. -

सदर राज्यस्तर समितीची रचना खालील प्रमाणे राहील :-

| अ.क्र. | पदनाम | अध्यक्ष/सदस्य |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय | अध्यक्ष |
| २ | केंद्रीय सार्वजनिक आरोग्य विभाग (कुष्ठरोग) | सदस्य |
| ३ | विभाग प्रमुख , त्वचारोग विभाग बी.जे.मेडिकल कॉलेज, पुणे / जे.जे.हॉस्पीटल, मुंबई | सदस्य |
| ४ | विभाग प्रमुख , अस्थीरोग विभाग बी.जे.मेडिकल कॉलेज, पुणे / जे.जे.हॉस्पीटल, मुंबई | सदस्य |
| ५ | सहसचिव/उपसचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय | सदस्य |
| ६ | सहसचिव/उपसचिव, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय | सदस्य |
| ७ | सहसचिव/उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय | सदस्य |
| ८ | सहसचिव/उपसचिव, महिला व बालविकास विभाग, मंत्रालय | सदस्य |

| अ.क्र. | पदनाम | अध्यक्ष/सदस्य |
|---|---|---|
| ९ | सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय | सदस्य |
| १० | कुष्ठरुग्णांसाठी काम करणाऱ्या स्वयंसेवी संस्थांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ११ | सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षयरोग), पुणे | सदस्य सचिव |

२. कुष्ठरुग्णांसाठी काम करणाऱ्या स्वयंसेवी संस्थांचे प्रतिनिधी म्हणून डॉ. विकास आमटे, महारोगी सेवा समिती, आनंदवन, जि.चंद्रपूर, डॉ. उदय ठकार, कुष्ठरोग निवारण समिती, शांतीवन, नेरे पनवेल, नवी मुंबई, डॉ. विवेक पै, बॉम्बे लेप्रसी प्रोजेक्ट, मुंबई तसेच कुष्ठपिडीत समस्या निवारण समितीचे प्रतिनिधी व PAL (कुष्ठबाधित व्यक्ती) या संस्थेचे प्रतिनिधी यांचा सदर समितीत समावेश करण्यात येत आहे.

३. समितीची कार्यकक्षा :- राज्यातील कुष्ठरुग्णांच्या पुनर्वसनासाठी नोकरीत संधी निर्माण करुन देणे व कुष्ठरुग्णांना मिळणाऱ्या शासकीय योजनांच्या लाभाची व्याप्ती वाढविणे, हे समितीचे मुख्य कार्य राहील.

४. बैठकीचे आयोजन :- सदर समितीची बैठक किमान वर्षातून एकदा घेण्यात यावी.

५. कुष्ठरुग्णांच्या पुनर्वसनासाठी शासनाच्या विविध योजना :- संजय गांधी निराधार योजना, इंदिरा आवास योजना, महाराष्ट्र राज्य अपग वित्त व आर्थिक विकास महामंडळ, बँक लोन, अपंग व्यक्तीसाठी बीज भांडवल, आर्थिक सहाय्य व स्वयंरोजगार इ. योजनांच्या माध्यमातून कुष्ठरुग्णांचे पुनर्वसन करणे शक्य आहेत. परंतू वरील सर्व योजना आरोग्य विभागाच्या अखत्यारित येत नसल्यामुळे सर्व संबंधीत विभागांशी उत्तम समन्वय आवश्यक असल्यामुळे सर्वसमावेशाक अशी समिती नेमण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७२५१४०६०१०५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F7ECA1F400D866EA34324CEA1A547AA04F0DA0794A00BEE126E8678172A15C5, cn=ASHOK MAROTI ATRAM
Date: 2023.07.26 15:46:10 +05'30'

(अशोक आत्राम)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत:-

१. अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, विधी व न्याय, विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग,मंत्रालय, मुंबई

४. प्रधान सचिव, महिला व बालविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव, माहिती व तंत्रज्ञान, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
८. संचालक, आरोग्य सेवा, आयुक्तालय, आरोग्य भवन, मुंबई.
९. सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षयरोग), पुणे.
१०. उपसंचालक, आरोग्य सेवा, परिमंडळ, सर्व.
११. जिल्हा शल्यचिकित्सक, जिल्हा सामान्य रुग्णालय (सर्व)
१२. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१३. तालुका आरोग्य अधिकारी (सर्व)
१४. डॉ. विकास आमटे, महारोगी सेवा समिती, आनंदवन, जि.चंद्रपूर.
१५. डॉ. उदय ठकार, कुष्ठरोग निवारण समिती, शांतीवन, नेरे पनवेल, नवी मुंबई.
१६. डॉ. विवेक पै, बॉम्बे लेप्रसी प्रोजेक्ट, मुंबई तसेच कुष्ठपिडीत समस्या निवारण समिती.
१७. PAL (कुष्ठबाधित व्यक्ती) या संस्थेचे प्रतिनिधी.
१८. निवडनस्ती (आ-५)

प्रत माहितीसाठी :-

१. मा. मंत्री (सा.आ.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.